राज्यातील लघुयंत्रमाग धारकांकरीता प्रोत्साहन योजना.

GR20040729114544001-1100

**महाराष्ट्र शासन**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

शासन निर्णय क्रमांक आयडीएल-१००४/प्र.क्र.९७ (अ)/उद्योग-८,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ५ जुलै, २००४

वाचा : १) शासन निर्णय सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक यंत्रमाग-१०२००३/ प्र.क्र.१५२/टेक्स-३, दि.११.२.२००४

२) शासन निर्णय सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक संकीर्ण-१०२००२/ प्र.क्र.६४/टेक्स-२, दि.२४.२.२००४

३) शासन निर्णय क्रमांक आयडीएल-१००४/प्र.क्र.९७ (अ)/उद्योग-८, दिनांक : २५ मे,२००४

**प्रस्तावना :**

राज्यातील लघुयंत्रमाग धारकांच्या समस्यांबाबत प्रोत्साहन योजने संबंधात शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग आयडीसी-१००४/प्र.क्र.९७ (अ)/उद्योग-८, दिनांक २५ मे, २००४ नुसार मार्गदर्शक तत्वे विहित करण्यात आली होती. त्यात सुधारणा करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

दिनांक २५ मे, २००४ च्या शासन निर्णयानुसार विहित करण्यात आलेली मार्गदर्शक तत्वे रद्द करण्यात येत आहेत.

शासनाने जाहीर केलेल्या लघुयंत्रमाग धारकांच्या समस्यांसंदर्भात पॅकेज योजनेअंतर्गत ज्या यंत्रमाग घटकांसंदर्भात बँका / वित्तीय संस्था यांनी दि.३१.१२.२००३ पूर्वी कर्ज वसूलीसाठी कारवाई म्हणजेच सहकारी कायद्याअंतर्गत १०१ कलमाखाली घेतली असल्यास अगर बँका / वित्तीय संस्था यांनी डी.आर.टी. नुसार कारवाई, ताबा घेणे किंवा कर्ज वसुलीसाठी यंत्रमाग घटकास सील केले असल्यास ओ.टी.एस.च्या योजनेनुसार किंवा बँका/वित्तीय संस्था आणि यंत्रमाग घटक यामध्ये तडजोडीने निश्चित केलेल्या रक्कमेच्या ५० टक्के रक्कम शासनामार्फत देण्यात येणार आहे. त्यासंबंधातील मार्गदर्शक तत्वे खालीलप्रमाणे विहित करण्यात येत आहेत.

१. सहकारी बँकानी सहकारी कायद्याअंतर्गत १०१ कलमाखाली वसुलीसाठी प्रत्यक्ष कारवाई सुरु केली असल्यास, बँका / वित्तीय संस्था यांनी डी.आर.टी.नुसार वसुलीसाठी प्रत्यक्ष कारवाई सुरु केली असल्यास, बँक / वित्तीय संस्था यांनी वसुलीसाठी यंत्रमाग घटकाचा प्रत्यक्ष ताबा घेतला असल्यास किंवा सील केले असल्यास, वरील कारणांमुळे यंत्रमाग घटक जरी बंद असला किंवा दि.३१.१२.२००३ च्या तारखेपूर्वी बँका किंवा वित्तीय संस्थेने यंत्रमाग घटक ताब्यात घेतला असला तरी जर बँक / वित्तीय संस्था यांनी

रोटा प्रिंट/एच-515(500-7-04)1

वरीलप्रमाणे ओ.टी.एस.नुसार अगर तडजोडीने रक्कम निश्चित करुन ५० टक्के रक्कम भरुन घेऊन उर्वरित रक्कमेचे जास्तीत जास्त ५ वर्षातील रिशेड्युल करण्यास तयार असल्यास पुनर्जिवन केलेले यंत्रमाग घटक ५० टक्के भाग अनुदान घेण्यास पात्र राहतील. प्रत्येक यंत्रमाग घटकाकरिता शासनाकडून द्यावयाच्या भाग अनुदानाची कमाल मर्यादा रुपये ५ लाख राहील.

२. बँक / वित्तीय संस्था यांनी सदर घटकास शासनाने द्यावयाची अनुदानाची रक्कम दिल्यानंतर उर्वरित राहिलेल्या ५०% कर्जाच्या परतफेडीसाठी रकमेच्या जास्तीत जास्त ५ वर्षापर्यंत हप्त्याची पुर्नबांधणी करुन देणे आवश्यक आहे.

३. जिल्हा उद्योग केंद्राकडे लघुउद्योग म्हणून नोंदणी किंवा वस्त्रोद्योग आयुक्त यांच्याकडील नोंदणी केल्यानंतरच घटक या योजनेचा फायदा घेण्यास पात्र राहतील.

४. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र यांनी तो घटक पुन्हा चालू होणार आहे. याबाबत संबंधित यंत्रमाग घटकाकडून प्रतिज्ञापत्र घेतल्यानंतर तो घटक प्रस्तुत योजनेअंतर्गत सवलती घेण्यास पात्र धरण्यात यावा.

५. कॉमन शेड किंवा एका शेडमध्ये एकापेक्षा जास्त यंत्रमाग धारकांना वेगवेगळी लघुउद्योग नोंदणी देता येईल. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची औद्योगिक क्षेत्रे किंवा सहकारी औद्योगिक वसाहत यातील घटकांनाही अशा प्रकारची नोंदणी घेता येईल. मात्र संबंधित संस्थांची परवानगी घेणे बंधनकारक राहील. खाजगी शेडमध्ये जास्त घटक असल्यास शेड मालकाची परवानगी घेणे बंधनकारक राहील.

६. जे यंत्रमाग घटक पुर्नजिवित करण्यासाठी बँकेने / वित्तीय संस्थेने निश्चित केले असतील व त्यांच्या पुर्नरचित कर्जाच्या रकमेच्या परतफेडीचे हप्ते व व्याज घटक नियमित भरत असेल तर कर्जाच्या रकमेवर बँक आकारीत असलेल्या व्याजाच्या ५ टक्के एवढे अनुदान (उदा.बँक १५ टक्के व्याज आकारीत असेल तर त्या व्याजातील ५ टक्के शासन देईल व १० टक्के यंत्रमाग धारकांना द्यावयाचे आहेत.) जास्तीत जास्त ५ वर्षापर्यन्त यंत्रमाग धारकास देय होईल. त्याकरिता मुद्दलाच्या हप्त्याची परतफेड व व्याजाचा भरणा नियमित केल्याबाबतचे बँकेचे प्रमाणपत्र जिल्हा उद्योग केंद्रास घटकाने प्रतिवर्षी सादर केल्यावरच व्याज अनुदान देय राहील.

७. या योजनेअंतर्गत पात्र असलेल्या यंत्रमाग घटकाना पात्र ठरविलेल्या दिनांकापर्यंतची राज्य शासनाची सर्व थकलेली देणी म्हणजेच विक्रीकर, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ यांच्या थकबाकीची मुळ रक्कम ६० मासिक हप्त्यात वसूल करण्यात येईल. तसेच थकबाकीवर १० टक्के प्रतीवर्षी या दराने व्याज वसूल करण्यात येईल.

८. ज्या घटकांच्या नावावर यंत्रमाग आहेत अशा यंत्रमाग घटकांनी खेळत्या भांडवलासाठी घेतलेले कर्जा व्यतिरिक्त त्याच घटकाने आपल्या मालकीच्या किंवा भागीदारीतील घटकामार्फत कापड विक्रीसाठी एखादी कंपनी (फर्म) काढली असेल अशा घटकासाठी त्याने रोख कर्जाबरोबर घेतलेले खेळते भांडवली कर्ज किंवा कापड विक्रीसाठी स्थापन

केलेल्या कंपनी (फर्म) मार्फत घेतलेले कर्ज यापैकी एकाचाच या योजनेअंतर्गत विचार करण्यात येईल.

९. ज्या घटकांचे यंत्रमाग रोख कर्ज व खेळते भांडवल या पोटीच्या कर्जफेडीसाठी बँका अगर वित्तीय संस्था यांचेमार्फत दिनांक १ एप्रिल २००१ नंतर विकण्यात आले आहेत. किंवा यंत्रमाग घटकांने यंत्रमाग विकून स्व:ता बँकेत/वित्तीय संस्थेत रक्कम जमा केली आहे. अशा घटकांची उर्वरीत राहिलेल्या थकबाकीबाबत यंत्रमाग घटक व बँका/वित्तीय संस्था यांनी तडजोडीने निश्चित केलेल्या रक्कमेच्या ५०% टक्के रक्कम अनुदान घेण्यास यंत्रमाग घटक पात्र राहतील.

१०. एकाच शेडमधील ज्या यंत्रमाग धारकांकडे डाईंग, शिलाई मशीन या सुविधा आहेत. अशा यंत्रमाग धारकांनी एकाच गहाण खतावर वित्तीय सहाय्य घेतलेले आहे व मार्गदर्शक तत्वात बसत असतील तर असे यंत्रमाग धारकही या योजनेअंतर्गत सवलती मिळण्यास पात्र आहेत.

११. यंत्रमाग धारक घटकामध्ये साधे / सेमीऑटो / ऑटो / जेकॉर्ड / टेरीटॉवेल / शटललेस या सर्व प्रकारचे यंत्रमाग धारक घटकांचा समावेश होईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सु.ज.सोवितकर)
कक्षअधिकारी